**डेहणी उपसा ठिबक सिंचन योजनेच्या कामाकरीता आवश्यक असलेली पदनिर्मिती करुन, पदे उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा-२०१८/प्र.क्र.९१/२०१८/आस्था.(पुनर्रचना)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख : १९ ऑक्टोबर २०१८.

वाचा:- १. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. १०९२/सीआर/८०६/व्यय-६, दि.१५/१०/१९९२.
२. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.आढावा-१००२/३३५/२००२/आ.(प्रशि), दि.०६/०२/२००३.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/ प्र.क्र.४१/ अर्थ-१, दि.०२.०६.२०१५.
४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/ प्र.क्र.३०/ २०१६/ आ.पु.कक्ष, दि.२५.०५.२०१७.
५. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. आढावा-२०१८/ प्र.क्र.९१/ २०१८/ आ.(प्रशि), दि.१६/०७/२०१८.

**प्रस्तावना -**

डेहणी उपसा ठिबक सिंचन योजनेच्या कामासाठी अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये बेंबळा पुनर्वसन उपविभाग क्र.३, थाळेगांव हे उपविभागीय कार्यालय मंजूर आस्थापनेसह डेहणी मुख्यालयी डेहणी उपसा सिंचन उपविभाग, डेहणी या नावाने स्थलांतरीत करण्यात आले आहे. या योजने अंतर्गत स्थापत्य/ यांत्रिकी/ विद्युत/ कृषी-पणन व स्वयंचलित यंत्रणा इत्यादी घटक कामे अंतर्भूत असून, या कार्यप्रकारातील कृषी, पणन व माहिती तंत्रज्ञान या क्षेत्रातील काही पदे विभागाच्या क्षेत्रीय आस्थापनेवर मंजूर नाहीत. तथापि, योजनेच्या घटक कामांच्या उभारणी व सुनियोजित परिचलन इ. तद्नुषंगिक कामांसाठी आस्थापना उपलब्ध करुन देण्याकरीता सन-२०१८ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात उपस्थित झालेल्या लक्षवेधी सूचनेवरील चर्चे दरम्यान याबाबतच्या प्रस्ताव मंजूरीबाबत लवकरात लवकर कार्यवाही करण्यात येईल, असे आश्वासन सभागृहात दिलेले आहे. सबब, डेहणी उपसा ठिबक सिंचन योजनेच्या कामासाठी आस्थापना आवश्यक असल्याने वित्त विभाग, शासन निर्णय दि.०२.०६.२०१५ मधील परिच्छेद ४ मधील तरतूदीनुसार कोणताही अधिकचा वित्तीय भार न पडता डेहणी उपसा ठिबक सिंचन योजनेच्या कामासाठी स्थलांतरीत केलेल्या बेंबळा पुनर्वसन उपविभाग क्र.३, थाळेगांव या उपविभागीय कार्यालयातील समकक्ष वेतनश्रेणीच्या संवर्गातील पदे रुपांतरीत करुन, ही पदे डेहणी उपसा सिंचन उपविभाग, डेहणी या उपविभागीय कार्यालयास उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अ.क्र.३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयातील तरतूदीस अनुसरुन प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार, अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये स्थलांतरीत करण्यात आलेल्या बेंबळा पुनर्वसन उपविभाग क्र.३, थाळेगांव या उपविभागीय कार्यालयास मंजूर असलेल्या पदांच्या १० संवर्गापैकी ४ संवर्गातील ८ पदे समकक्ष वेतनश्रेणीच्या संवर्गात रुपांतरीत करुन, स्थलांतरणाने कार्यान्वित करण्यात आलेल्या डेहणी उपसा सिंचन उपविभाग, डेहणी या कार्यालयास उपलब्ध करुन देण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२.  उपरोक्त प्रमाणे डेहणी उपसा ठिबक सिंचन योजनेच्या कामासाठी अ.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये तात्पुरत्या स्वरुपात उपलब्ध करुन दिलेल्या मंजूर संवर्गातून खालील प्रमाणे समकक्ष वेतनश्रेणीच्या संवर्गातील पदे रुपांतरीत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | तात्पुरत्या स्वरुपात उपलब्ध करुन दिलेले संवर्ग | उपलब्ध करुन दिलेल्या संवर्गातील पदाची वेतनश्रेणी | मंजूर पदे | मंजूर केलेला संवर्ग | मंजूर संवर्गाच्या पदाची वेतनश्रेणी | रुपांतरीत संवर्गातील पदांची संख्या | मंजूर संवर्गानुसार उपलब्ध करुन दिलेली एकूण पदसंख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 |
| १ | उप अभियंता (स्थापत्य) | रु.१५६००-३९१०० GP(रु.५४००) | १ | उप अभियंता (स्थापत्य) | रु.१५६००-३९१०० GP(रु.५४००) | - | १ |
| २ | **कनिष्ठ अभियंता (स्थापत्य)** | रु.९३००-३४८०० GP(रु.४३००) | ४ | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) | रु.९३००-३४८०० GP(रु.४३००) | - | १ |
| | | | | **कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी) (रुपांतरीत संवर्ग)** | | **१** | १ |
| | | | | **कनिष्ठ अभियंता (विद्युत) (रुपांतरीत संवर्ग)** | | **१** | १ |
| | | | | **कृषी अधिकारी/ कृषी तज्ञ (रुपांतरीत संवर्ग)** | | **१** | १ |
| ३ | **स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक** | रु.५२००-२०२०० GP(रु.२४००) | ४ | स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक | रु.५२००-२०२०० GP (रु.२४००) | - | १ |
| | | | | **कृषी सहाय्यक (रुपांतरीत संवर्ग)** | | **१** | १ |
| | | | | **यांत्रिकी सहाय्यक (रुपांतरीत संवर्ग)** | | **१** | १ |
| | | | | **विद्युत सहाय्यक (रुपांतरीत संवर्ग)** | | **१** | १ |
| ४ | अनुरेखक | रु.५२००-२०२०० GP (रु.२००० व सेवेच्या ७ वर्षानंतर रु. २४००) | १ | - | - | - | - |
| ५ | वरिष्ठ लिपिक | रु.५२००-२०२०० GP(रु.२४००) | १ | वरिष्ठ लिपिक | रु.५२००-२०२०० GP(रु.२४००) | - | १ |
| ६ | **कनिष्ठ लिपिक** | रु.५२००-२०२०० GP(रु.२४००) | २ | कनिष्ठ लिपिक | रु.५२००-२०२०० GP(रु.१९००) | - | १ |
| | | | | **माहिती संकलक (Data Opretor) (रुपांतरीत संवर्ग)** | | **१** | १ |
| ७ | **टंकलेखक** | रु.५२००-२०२०० GP(रु.२०००) | १ | **पंप चालक (रुपांतरीत संवर्ग)** | रु.५२००-२०२०० GP(रु.१९००) | **१** | १ |
| ८ | वाहन चालक | रु.५२००-२०२०० GP(रु.१९००) | १ | वाहन चालक | रु.५२००-२०२०० GP(रु.१९००) | - | १ |
| ९ | शिपाई | रु.४४४०-७४४० GP(रु.१३००) | २ | शिपाई | रु.४४४०-७४४० GP(रु.१३००) | - | १ |
| १० | चौकीदार | रु.४४४०-७४४० GP(रु.१३००) | १ | चौकीदार | रु.४४४०-७४४० GP(रु.१३००) | - | १ |
| ११ | --- | --- | - | कनिष्ठ अभियंता (संगणक) | सदर संवर्ग व वेतनश्रेणीबाबत स्वतंत्ररित्या निर्णय घेण्यात येईल. | - | - |
| १२ | --- | --- | - | कृषी पणन अधिकारी | | - | - |
| | **एकूण** | | १८ | **रुपांतरीत संवर्ग संख्या (८)**<br>**उपलब्ध करुन दिलेले एकूण संवर्ग व पदे (१६)** | | ८ | १६ |

३. वरील प्रमाणे मंजूर संवर्गापैकी जे रुपांतरीत संवर्ग या विभागाशी संबंधित नाहीत, त्या संवर्गातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांची सेवा संबंधित विभागाकडून प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन घेण्यात यावी. तसेच मंजूर संवर्गातील उर्वरित तांत्रिक/ अतांत्रिक अधिकारी/ कर्मचाऱ्यांची सेवा विभागाधिनस्त त्या-त्या संबंधित आस्थापना / परिमंडळ यंत्रणांकडून उपलब्ध करुन घेण्यात यावी.

४. वरीलपैकी कनिष्ठ अभियंता (संगणक) व कृषी पणन अधिकारी या दोन संवर्गातील पदे उपलब्ध करुन देण्याबाबत स्वतंत्ररित्या निर्णय घेण्यात येईल.

५. दिनांक १६/७/२०१८ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या १८ पदांपैकी १६ पदे परिच्छेद-२ मध्ये दर्शविल्यानुसार उपलब्ध करुन देण्यात येत असून या योजनेसाठी आवश्यक नसलेल्या उर्वरित अनुरेखक-१ व शिपाई-१ या २ पदांबाबत शासन स्तरावर निर्णय घेण्यात येईल. तसेच, या दोन्ही पदांवर कर्मचारी कार्यरत असल्यास सदर कर्मचाऱ्यांचे समावेशन मंडळ कार्यालयाने अन्य कार्यालयांतर्गतच्या रिक्त पदांवर करण्यात यावे.

६. तसेच, दिनांक १६/७/२०१८ च्या शासन निर्णयातील अटी व शर्ती, नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी यामध्ये कोणताही बदल नाही. तसेच, यान्वये उपलब्ध करुन दिलेल्या आस्थापनेवरील वेतन व वेतनेतर खर्च संबंधित मंडळ कार्यालयांच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक ०२-०६-२०१५ मधील तरतूदींनुसार हा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१९१२३०००८२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Gangaram Gangarkar

Digitally signed by Sunil Gangaram Gangarkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8b2512fdfec4104829bc2f439e33adb2e3f823a285cfade8149e690564bc13f6, cn=Sunil Gangaram Gangarkar
Date: 2018.10.19 12:36:46 +05'30'

**(सु. गं. गांगरकर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४) मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा.
७) मा. विधानपरिषद / विधानसभा सदस्य (सर्व).

८) प्रधान सचिव (ज.सं.प्र.व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (ज.सं.व्य.व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१२) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर.
१३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४) महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन, सुरक्षा, नाशिक. (DTHRS)
१५) सर्व कार्यकारी संचालक, महामंडळ कार्यालये.
१६) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१७) सह सचिव (प्रशासन), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती.
१९) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
२१) उप सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) उप सचिव (आस्था.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२५) अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ. (बांधकाम)
२६) अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ. (सिंचन)
२७) अधीक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मुंबई.
२८) कार्यकारी अभियंता, बेंबळा प्रकल्प विभाग, यवतमाळ.
२९) कार्यकारी अभियंता, बेंबळा पाटबंधारे विभाग, यवतमाळ.
३०) कार्यकारी अभियंता, प्रशासकीय संगणकीकरण विभाग, (उपविभागाच्या मुख्यालय बदलाची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव)
३१) उप अभियंता, डेहणी उपसा सिंचन उपविभाग, डेहणी.
३२) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३३) आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.

**************